राज्यातील विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील विद्यार्थ्यांचे प्रलंबित शिष्यवृत्ती/ फ्रिशिपचे अर्ज निकाली काढण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक : बैठक २०२२/प्र.क्र.१५/शिक्षण-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १६ मार्च,२०२२.

**संदर्भ** :- शासन परिपत्रक,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. बैठक २०२०/प्र.क्र.११२/ शिक्षण-१, दि. ०३/०२/२०२१.

**शासन परिपत्रक :**

संदर्भिय नमुद शासन परिपत्रकानुसार विशेष चौकशी पथकाच्या अहवालात नमुद ७० महाविदयालयांबाबत विशेष चौकशी पथकाने तपासणी / चौकशी केलेल्या कालावधीनंतर, सन २०१७ -१८ पासुन प्रवेशित संबंधित ७० महाविदयालयांतील सर्व अभ्यासक्रमाच्या अनुसुचित जाती प्रवर्गातील पात्र विदयार्थ्यांना योजनेच्या अटी व शर्तीची पूर्तता होत असल्यास, असे विदयार्थी शैक्षणिक लाभापासुन वंचित राहु नयेत म्हणून, त्यांना देय असलेली शिष्यवृत्ती / शिक्षण शुक्ल, परीक्षा शुल्काची प्रतीपुर्ती अदा करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. सदरील संदर्भिय शासन निर्णयानुसार अनुसुचित जातीतील शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासुन प्रवेशित विदयार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजुर करण्यात आलेली आहे. तथापि, इतर मागास वर्ग, विमुक्त जाती भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांची शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासुन प्रवेशित विदयार्थ्यांची शिष्यवृत्ती मंजुर करण्यात आली नसल्याने इतर मागास प्रवर्गातील विदयार्थ्यांचे शैक्षणिक व आर्थिक नुकसान होत आहे. त्यामुळे संदर्भिय शासन परिपत्रकाच्या धर्तीवर इतर मागास वर्ग, विमुक्त जाती भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासुन प्रवेशित विदयार्थ्यांची शिष्यवृत्ती खाली नमूद केल्यानुसार मंजुर करण्यात यावी.

(१) विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील विद्यार्थ्यांचे शिष्यवृत्ती, फ्रिशीप, विद्यावेतन अशा एकूण चार योजनांचे शैक्षणिक लाभ थेट विद्यार्थ्यांच्या आधारसंलग्न बँक खात्यावर अदा करण्याची कार्यवाही सन २०१८-१९ पासून सुरु झालेली आहे. विशेष चौकशी पथकाच्या अहवालात नमूद ७० महाविद्यालयांबाबत विशेष चौकशी पथकाने तपासणी/ चौकशी केलेल्या कालावधीनंतर, सन २०१७-१८ पासून प्रवेशित संबंधित ७० महाविद्यालयांतील विहित अभ्यासक्रमाच्या विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील पात्र विद्यार्थ्यांना योजनेच्या अटी व शर्तीची पुर्तता होत असल्यास, असे विद्यार्थी शैक्षणिक लाभापासून वंचित राहू नयेत म्हणून, शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासुन त्यांना देय असलेली शिष्यवृत्ती/ शिक्षण शुल्क, परिक्षा शुल्काची प्रतिपूर्ती अदा करण्याचा प्रस्ताव संबंधित सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांनी तपासून शासनास तात्काळ सादर करावा.

(२) त्याअनुषंगाने, सन २०१७-१८ या कालावधीतील शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क, परिक्षा शुल्काच्या प्रलंबित अर्जावर तत्कालीन परिस्थितीनुसार ऑफलाईन पध्दतीने ( Manual) कार्यवाही होणे आवश्यक असून, त्याकरीता वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप

विभाग-एक, मुंबई वित्तीय नियम १९५९ अंतर्गत अ.क्र.६, नियम-४० खालील प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार विहित अटी व शर्तीची पुर्ततेसह परिपुर्ण प्रस्ताव शासनास सादर करुन, शासनाकडून अन्वेषण प्रमाणपत्र प्राप्त करावेत.

(३) सन २०१८-१९ पासून शिष्यवृत्ती/फ्रिशिप योजनांची अंमलबजावणी महाडिबीटी प्रणालीवर होत असल्याने, सन २०१८-१९, सन २०१९-२० व सन २०२०-२१ या कालावधीतील संबंधित ७० महाविद्यालयातील प्रवेशित विद्यार्थ्यांचे नोंद झालेले परंतु मंजूर न झालेले अर्ज निकाली काढण्यासाठी माहिती व तंत्रज्ञान विभागास महाडिबीटी प्रणालीवर अर्ज दुरुस्तीची सुविधा उपलब्ध करुन द्यावी. त्याद्वारे सदरील अर्ज विशिष्ठरित्या संगणकीकृत करुन प्रणालीमध्ये नोंदणी करुन निकाली काढण्याची कार्यवाही करण्यात यावी.

(४) सन २०१८-१९, सन २०१९-२० व सन २०२०-२१ या कालावधीत संबंधित ७० महाविद्यालयांपैकी ज्या महाविद्यालयातील विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील विद्यार्थ्यांच्या अर्जाची महाडिबीटी प्रणालीवर नोंद झालेली नाही, असे अर्ज विशिष्ठरित्या संगणकीकृत करुन प्रणालीमध्ये नोंदणी करुन वरील अ.क्र. (२) येथील कार्यपध्दती अनुसरुन निकाली काढण्याची कार्यवाही करावी. परंतु, असे अर्ज निकाली काढण्यात आल्यानंतर त्यांची नोंद घेण्याकरीता/ माहिती संकेतस्थळावर अपलोड करण्याकरिता त्याबाबतचा अहवाल माहिती व तंत्रज्ञान विभागास सादर करावा.

(५) माहिती व तंत्रज्ञान विभागाने सन २०१८-१९, सन २०१९-२० व सन २०२०-२१ या कालावधीतील ऑफलाईन पध्दतीने निकाली काढलेल्या अर्जाबाबतची माहिती विशिष्ठरित्या संगणकीकृत करुन प्रणालीमध्ये नोंदणी करुन महाडिबीटी प्रणालीवरील होमपेजवर स्वतंत्र टॅब अंतर्गत शैक्षणिक वर्षनिहाय व योजना निहाय जतन करुन ठेवण्यासाठी सुविधा निर्माण करावी.

(६) लेखापरिक्षणाच्या दृष्टीने वरील कार्यपध्दती अनुसरुन निकाली काढण्यात आलेल्या प्रलंबित अर्जाबाबतचे अभिलेख/ दस्तवेज जतन करुन ठेवण्याची जबाबदारी संबंधित सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांची राहील.

२. संबंधित ७० महाविदयालयांतील सन २०१७-१८ पासुन आणि सदर ७० महाविद्यालये वगळून इतर सर्व महाविद्यालये/ संस्थांचे सन २०१०-११ ते सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षातील प्रलंबित शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क, परिक्षा शुल्क चे एकत्रित प्रस्ताव जिल्हानिहाय शासनास सादर करावेत.

३. सदरहू शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संकेताक क्रमांक २०२२०३१६१२४८०७४६३४ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anand Arjun Mali

Digitally signed by Anand Arjun Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Other Backward Bahujan Welfare Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=59263c7d26f3bdec48de1cd25ecd14cf02ebfd6186340cda58b64221d2b8afc2, serialNumber=e135b1978c7460d1cd36b72fa21d1aed331de379b53c0db98bee892d3ccd8117, cn=Anand Arjun Mali
Date: 2022.03.16 12:50:15 +05'30'

**(आनंद माळी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय,मुंबई.

२. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान (सा.प्र.वि), मंत्रालय,मुंबई.
३. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई.
४. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
५. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
६. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे.
७. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे.
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
९. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, सर्व प्रादेशिक विभाग
११.सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, सर्व जिल्हे.
१२.मुख्य परिचलन अधिकारी, महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ लि. चर्चगेट, मुंबई.
१३.महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेय/लेखा परिक्षा) महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर,
१४.अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१५.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१६.निवडनस्ती (शिक्षण-१).